**श्री. त्रिंबक लहानू शिरसाट, औरंगाबाद यांना स्वातंत्र्यसैनिक निवृत्तीवेतन मंजूर करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक पीओएस-१२०९/१०२६/प्र.क्र.७८/२००९/स्वासैक-२**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १९ एप्रिल, २०१७

<u>वाचा</u> :- १. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.पीओएस-१०९३/ प्र.क्र.१२७/स्वासैकक्ष, दिनांक ४.७.१९९५.
२. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.पीओएस १०९७/ प्र.क्र.७६/९७/स्वासैक-१, दिनांक १८.४.२०१५.
३. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.पीओएस १०९७/ प्र.क्र.७६/९७/स्वासैक-१, दिनांक १५.५.२०१५.
४. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.निवृवे-१०१६/ प्र.क्र.७८/स्वासैक-१, दिनांक २.६.२०१६.
५. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.न्यायाप्र-१२१४/ प्र.क्र.४७/२०१४/स्वासैक-१, दिनांक ३०.७.२०१६.

**<u>प्रस्तावना</u> :-**

श्री.त्रिंबक लहानू शिरसाट यांचे प्रकरणी शासन निर्णय दिनांक ४.७.१९९५ च्या विहीत निकषांची पूर्तता होत नसल्याने त्यांचा स्वातंत्र्यसैनिक निवृत्तीवेतनाचा प्रस्ताव यापूर्वी शासन स्तरावर अमान्य करण्यात आला असून त्यानुषंगाने त्यांना शासन पत्र समक्रमांक दिनांक २३.११.२०११ अन्वये कळविण्यात आले आहे. तद्नंतर शासनाच्या विहित निकषांनुसार आवश्यक पुरावे सादर करता येत नसल्याचे स्पष्टीकरण देऊन श्री.शिरसाट यांनी दिनांक ४.१०.२०१५ च्या अर्जान्वये पुन्हा शासनास स्वातंत्र्यसैनिक निवृत्तीवेतन मंजूरीची विनंती केली. त्यावेळी श्री.शिरसाट यांचे प्रकरणाचा शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक पीओएस-१०९७/प्र.क्र.७६/९७/स्वासैक-१, दिनांक १८.४.२०१५ मधील तरतूदीनुसार पुनर्विचार करता येणार नाही असा निर्णय शासनाने घेतला व त्यानुसार त्यांना शासन पत्र समक्रमांक, दिनांक १६.२.२०१६ च्या पत्रान्वये कळविण्यात आले.

यासंदर्भात श्री.त्रिंबक लहानु शिरसाट यांनी मा.उच्च न्यायालय, औरंगाबाद खंडपीठ येथे रिट याचिका क्रमांक ५८९२/२०१३ दाखल केली होती. श्री.शिरसाट यांनी स्वातंत्र्यसैनिक निवृत्तीवेतन प्रस्तावाच्या समर्थनार्थ तहसिलदार, भोकरदन यांनी सादर केलेल्या उर्दू वॉरंट च्या आधारे त्यांचे प्रकरणी ४ महिन्याच्या कालावधीत पुन्हा निर्णय घेण्याचे मा.न्यायालयाने दिनांक २३.८.२०१६ रोजी आदेशित केले.

श्री.त्रिंबक शिरसाट यांनी त्यांच्या स्वातंत्र्यसैनिक निवृत्तीवेतनाच्या प्रस्तावाच्या समर्थनार्थ मौ.भोकरदन तहसिल कार्यालयाकडील गुन्हा रिपोर्ट १३५७ फसलीची छायांकित प्रत व भाषांतरीत प्रत दिनांक ३.५.२०१६ रोजी शासनास सादर केली व सदरचा नवीन पुरावा स्विकारुन स्वातंत्र्यसैनिक निवृत्तीवेतन मंजूरीची विनंती केली. सदर उर्दू गुन्हा रिपोर्टची सत्यता पडताळणीबाबत विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांना सखोल चौकशी करुन अहवाल सादर करण्याबाबत शासन पत्र दिनांक २४.११.२०१६ अन्वये कळविण्यात आले. विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांनी चौकशी अहवाल दिनांक १७.२.२०१७ रोजी शासनास सादर केला. तद्नंतर सदर उर्दू गुन्हा रिपोर्टच्या सत्यतेबाबत पोलीस चौकशी करण्याचे स्वातंत्र्यसैनिक उच्चाधिकार समितीने पुन्हा आदेशित केले. त्यानुसार, सदर उर्दू गुन्हा रिपोर्टच्या सत्यतेबाबत संबंधित पोलीस विभागाकडून चौकशी करुन अहवाल शासनास सादर करण्याबाबत विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांना शासन पत्र दिनांक २९.३.२०१७ अन्वये कळविण्यात आले. विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांनी सदर उर्दू गुन्हा रिपोर्टच्या सत्यतेबाबतचा पोलीस चौकशी अहवाल दिनांक १२.४.२०१७ च्या पत्रान्वये शासनास सादर केला आहे.

सदर उर्दू गुन्हा रिपोर्ट हा स्वातंत्र्यसैनिक निवृत्तीवेतनाकरिता नवीन पुरावा म्हणून मान्य करावयाचा धोरणात्मक निर्णय स्वातंत्र्यसैनिक उच्चाधिकार समितीने घेतला असल्याने सदर उर्दू गुन्हा रिपोर्टच्या आधारे स्वातंत्र्यसैनिक निवृत्तीवेतनाची मागणी केलेल्याध अर्जदारांस, संदर्भीय दिनांक २.६.२०१६ व दिनांक ३०.७.२०१६ च्या शासन निर्णयातील तरतूदींच्या अधीन राहून, स्वातंत्र्यसैनिक निवृत्तीवेतन मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. आता शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

मौ.भोकरदन तहसिल कार्यालयाकडील उर्दू गुन्हा रिपोर्ट १३५७ फसली हा स्वातंत्र्यसैनिक निवृत्तीवेतनाकरिता नवीन पुरावा विचारात घेऊन श्री.त्रिंबक लहानू शिरसाट यांना दिनांक २.६.२०१६ व दिनांक ३०.७.२०१६ च्या शासन निर्णयातील तरतूदींच्या अधीन राहून, या आदेशाच्या दिनांकापासून स्वातंत्र्यसैनिक सन्मान निवृत्तीवेतन मंजूर करण्यात येत आहे.

२. याप्रित्यर्थचा खर्च मागणी क्र.ए-५, प्रधान लेखाशीर्ष २२३५,सामाजिक सुरक्षा व कल्याण (६०) इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम (१०२) सामाजिक सुरक्षा योजनेखाली निवृत्तीवेतन (००)(०१) स्वातंत्र्य सैनिक व त्यांच्यावर अवलंबून असलेल्या व्यक्ती इत्यादींना निवृत्तीवेतन (२२३५००१५) या अर्थसंकल्पीय लेखाशीर्षाखाली चालू आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतुदीतुन भागविण्यात यावा व त्याच लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय दि.१५.५.२०१५ अन्वये पुनर्गठीत राज्यस्तरीय स्वातंत्र्य सैनिक उच्चाधिकार समितीच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०४१९१३१७०४०६०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Manjusha Salvi

Digitally signed by Manjusha Salvi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=DESK OFFICER, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5f3fd7897fea9717dd9115f782c19536afee03d1736a0283493a8863fadebb45, serialNumber=2a02139fd3ac94fcbacd18386c5c6655556f2e876e9782822225d5f1aa558dec, cn=Manjusha Salvi
Date: 2017.04.21 15:16:18 +05'30'

**(मंजुषा साळवी)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१ मा. मुख्यमंत्री, यांचे प्रधान सचिव,मंत्रालय, मुंबई
२ मा.राज्यमंत्री,सा.प्र.वि. यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
३ महालेखाकार (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, मुंबई/नागपूर (२ प्रती)
४ निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
५ जिल्हाधिकारी, औरंगाबाद (५ प्रती), (By R.P.A.D.) (त्यांना विनंती करण्यात येते की, केलेल्या कार्यवाहीचा अहवाल एक महिन्यात सादर करण्यात यावा).
६ जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद,
७ श्री.त्रिंबक लहानू शिरसाट, रा.पिंपळगाव वळण, पो.वाणेगाव, ता.फुलंब्री, जिल्हा औरंगाबाद (R.P.A.D.)
८ कक्ष अधिकारी (स्वासैक-१ /३)
९ निवडनस्ती (स्वासैक-२).

****